**राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा -२०१४ या वर्षाकरिता राज्यस्तरावरील विजेत्या कार्यालयांना पारितोषिकाची रक्कम मंजूर करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांअ-१११४/प्र.क्र.६८/१८अ,**
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: ३० मार्च,२०१५

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि., प्रसुधा-१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ, दि. ०२.०८.२००२
२) शासन निर्णय क्रमांकः रागाअ-२०१०/प्र.क्र.१५८/१०/१८-अ, दि. १६.०३.२०११

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ दि. ०२.०८.२००२ च्या शासन निर्णयानुसार राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा राज्यात दरवर्षी राबविण्यात येतात. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. रागांअ-२०१०/प्र.क्र.१५८/१०/१८-अ, दि. १६ मार्च २०११ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरील प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांकाच्या विजेत्या कार्यालयांना अनुक्रमे १० लक्ष, ६ लक्ष व ४ लक्ष रुपयांचे पारितोषिक मंजूर करण्यात येते.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा-२०१४ अंतर्गत राज्यस्तरीय स्पर्धेत समितीने निवडलेल्या विजेत्या कार्यालयांना पुढीलप्रमाणे पारितोषिकाची रक्कम मंजूर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिकाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | विक्रीकर आयुक्त,माझगाव,मुंबई | प्रथम | रु. १०,००,०००/-<br>(रु. दहा लाख फक्त) |
| २ | पोलीस आयुक्त, लोहमार्ग पोलीस,मुंबई | व्दितीय | रु. ६,००,०००/-<br>(रु. सहा लाख फक्त) |
| ३ | संचालक,सैनिक कल्याण विभाग,पुणे | तृतीय | रु. ४,००,०००/-<br>रु. चार लाख फक्त |
| | एकूण | | २०,००,०००/-<br>(रु. वीस लाख फक्त) |

उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे एकूण रु. २०,००,०००/-(रुपये वीस लक्ष फक्त) इतकी रक्कम संबंधित कार्यालयांना धनादेशाव्दारे उपलब्ध करुन देण्यास मंजूरी देण्यात येत आहे. याकरिता अवर सचिव, रोख शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या प्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च खालील लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ च्या अर्थ

संकल्प मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधुन खर्ची टाकण्यात यावा :-

"मागणी क्र. ए-४, प्रधानशीर्ष "२०५२" सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा "०९०"- सेक्रेटरिएट (००)(०१) सामान्य प्रशासन विभाग (संकेतांक क्र.२०५२००२५)-०५ बक्षिसे".

पारितोषिकाच्या रकमेचा वापर विजेत्यांनी कार्यालयीन सुधारणेसाठीच करावयाचा आहे. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा व खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात, खर्चाची कारणे व साक्षांकित देयकांच्या प्रतींसह धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन २६ व कार्यासन १८-अ, मंत्रालय मुंबई-३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१५०३३०१८४६४६५४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Manasi Pradip Indulkar

Digitally signed by Manasi Pradip Indulkar
DN: CN = Manasi Pradip Indulkar, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = General Administration Dept
Date: 2015.03.31 13:03:46 +05'30'

**(मानसी इंदुलकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१)विक्रीकर आयुक्त,माझगाव,मुंबई
२)पोलीस आयुक्त, लोहमार्ग पोलीस ,मुंबई
३)संचालक,सैनिक कल्याण विभाग,पुणे
४)सर्व विभागीय आयुक्त/ महानगरपालिका आयुक्त /जिल्हाधिकारी,
५)सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
६)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-१,मुंबई (प्रत्येकी २ प्रती),
७)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-२,नागपूर (प्रत्येकी २ प्रती),
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९)जिल्हा कोषागार अधिकारी /मुंबई / पुणे /
१०) वित्त विभाग/ व्यय-४,
११) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / का.क्र. २५ व २६
१२) निवड नस्ती, का.१८-अ